**लोकनेते स्व. गोपीनाथजी मुंडे, माजी उपमुख्यमंत्री व माजी केंद्रीय मंत्री यांचे औरंगाबाद येथे स्मारक उभारण्यासाठी गठित केलेल्या समितीच्या अध्यक्ष पदी नियुक्तीबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगरविकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: स्मारक-२०१५/प्र.क्र.६८/नवि-२४**
मादाम कामा रोड,हुतात्मा राजगुरु चौक,मंत्रालय
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- ०१ डिसेंबर, २०१६

वाचा : शासन निर्णय क्रमांक स्मारक २०१५/प्र.क्र. ६८/नवि २४ दि. ०२.०६.२०१५

**प्रस्तावना :**

लोकनेते स्व. गोपीनाथजी मुंडे यांचे औरंगाबाद येथे भव्य स्मारक उभारण्याची घोषणा शासनाने केली होती. सदर स्मारकाचा आराखडा निश्चित करण्यासाठी संदर्भाधिन शासन निर्णयान्वये, शासनस्तरावर मा. श्री. एकनाथजी खडसे, तत्कालीन मंत्री (महसूल) यांच्या अध्यक्षतेखाली एक समिती गठित करण्यात आली होती. श्री. एकनाथ खडसे यांनी मंत्री पदाचा राजीनामा दिल्याने सदर पद रिक्त झाले होते त्यामुळे सदर समितीच्या अध्यक्षपदी नव्याने नियुक्ती करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. आता शासन याबाबत खालीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :**

लोकनेते स्व. गोपीनाथजी मुंडे, यांचे औरंगाबाद शहरात भव्य स्मारक उभारण्यास्तव स्मारकाचा आराखडा निश्चित करण्यासाठी, संदर्भाकिंत दिनांक २ जून, २०१५ च्या शासन निर्णयान्वये गठित करण्यात आलेल्या समितीच्या अध्यक्षपदी मा. श्री. चंद्रकांत दादा पाटील, मंत्री महसूल, मदत व पुनर्वसन, सार्वजनिक बांधकाम यांची नियुक्ती करण्यात येत आहे. सदर बदलामुळे समितीची रचना खालील प्रमाणे राहील :-

| अ.क्र. | नाव व पदनाम | समितीतील पदनाम |
|---|---|---|
| १ | मा. श्री. चंद्रकांत दादा पाटील, मंत्री महसूल, मदत व पुनर्वसन, सार्वजनिक बांधकाम | अध्यक्ष |
| २ | मा. मंत्री (पर्यावरण) तथा पालक मंत्री, औरंगाबाद | सदस्य |
| ३ | मा. श्रीमती पंकजा मुंडे-पालवे, मंत्री, ग्राम विकास, महिला व बालकल्याण | सदस्य |
| ४ | मा. श्री. विनोद तावडे, मंत्री, शालेय शिक्षण | सदस्य |
| ५ | प्रधान सचिव (१) नगर विकास विभाग | सदस्य |
| ६ | सचिव (२) नगर विकास विभाग | सदस्य |
| ७ | विभागीय आयुक्त, औरंगाबाद | सदस्य |
| ८ | जिल्हाधिकारी, औरंगाबाद | सदस्य सचिव |
| ९ | आयुक्त, औरंगाबाद महानगरपालिका | सदस्य |
| १० | मुख्य प्रशासक (नवी शहरे) सिडको, औरंगाबाद | सदस्य |

**समितीची कार्यकक्ष खालील प्रमाणे :**

१. सिडको या कार्यान्वित यंत्रणेने तयार केलेले संकल्प चित्र व आराखडे यास अंतिम मान्यता देणे.

२. स्मारकाच्या बांधकामाचा आढावा घेणे.

३. स्मारकाच्या कामाचा दर्जा राखण्यासाठी मार्गदर्शन व शिफारस करणे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharastra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१६१२०११५२०११२६२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात आला आहे.

महाराष्ट्र राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sudhakar Dnyandeo Bobade

Digitally signed by Sudhakar Dnyandeo Bobade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=bc1634ab95abe4652ec2433f0ccd505c20ea3e7ecad3bfcb55d49ad9dbd0fe5e, serialNumber=2e4705465b9bdfd5b38b2d36aae83659869796cb8cc2aefbc550989feec27db1, cn=Sudhakar Dnyandeo Bobade
Date: 2016.12.01 15:23:38 +05'30'

**(सुधाकर ज्ञा. बोबडे)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा. मुख्यमंत्री महोदयांचे खाजगी सचिव
२) मा.मंत्री, महसूल यांचे ,खाजगी सचिव
३) मा. मंत्री, पर्यावरण तथा पालकमंत्री, औरंगाबाद यांचे खाजगी सचिव
४) मा. मंत्री, ग्रामविकास यांचे खाजगी सचिव
५) मा. मंत्री, शालेय शिक्षण यांचे खाजगी सचिव
६) मा. राज्यमंत्री, नगर विकास यांचे खाजगी सचिव
७) प्रधान सचिव, महसूल
८) प्रधान सचिव, नगर विकास (नवि १)
९) सचिव, नगर विकास (नवि २)
१०) व्यवस्थापकीय संचालक, सिडको
११) विभागीय आयुक्त, औरंगाबाद
१२) जिल्हाधिकारी, औरंगाबाद
१३) आयुक्त, औरंगाबाद महानगरपालिका
१४) मुख्य प्रशासन (नवी शहरे) सिडको, औरंगाबाद